# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

### अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### राज्यातील पूर्णवेळ कार्यरत ग्रंथपालांना पदावर कायम करण्याबाबत

**(१) १०८१ (२१-०१-२०१५). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत : तारांकित प्रश्न क्रमांक ५०१०५ ला दिनांक १४ जून, २०१४ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) दिनांक २७ जुलै, १९९० च्या शासन निर्णयानुसार अशासकीय माध्यमिक शाळेतील १००० विद्यार्थीसंख्येपेक्षा जास्त असलेल्या शाळांमध्ये कार्यरत पूर्णवेळ कार्यरत ग्रंथपालांना त्या शाळेतील विद्यार्थी संख्या कमी झाल्यास अर्धवेळ ग्रंथपाल न करता पूर्णवेळ ग्रंथपाल पदावरच कायम ठेवण्याचे निर्देश देण्यात आलेले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या शासन निर्णयाची अंमलबजावणी नागपूर विभागातील शिक्षण विभागाने केली आहे काय,

(३) तसेच सन १९९८ पासून अनुदानित अशासकीय माध्यमिक शाळांमधील अर्धवेतन श्रेणीवर अर्धवेळ ग्रंथपाल पदावर कार्यरत ग्रंथपालांची सेवा सेवानिवृत्ती वेतनास ग्राह्य धरण्यात येत नाही, हे ही खरे आहे काय,

(४) तसेच वित्त विभागाचा दिनांक १९ जुलै, २०११ चा शासन निर्णय शालेय शिक्षण विभागाला लागू करुन अर्धवेळ ग्रंथपालांना शासन न्याय देणार आहे काय,
(५) असल्यास, अशा किती शाळांमध्ये या शासन निर्णयाची अंमलबजावणी झालेली नाही,
(६) आणि या शासन निर्णयाची अंमलबजावणी करण्याचे आदेश नव्याने देणार आहेत काय ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३), (४), (५) व (६) राज्यातील खाजगी अनुदानित शाळेतील अर्धवेळ ग्रंथपाल यांचे पूर्णवेळ ग्रंथपाल पदी उन्नयन करण्याचा शासन निर्णय दिनांक १ सप्टेंबर, २०१८ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

---

## राज्यात सन २००५-२०१५ पर्यंत हरवलेल्या, बेपत्ता व्यक्तींच्या शोधाबाबत

**(२) ६७४५ (०६-०८-२०१५). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे, श्री.सुभाष झांबड, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात सन २००५-२०१५ पर्यंत हरवलेल्या, बेपत्ता व्यक्तींची संख्या सुमारे १ लाख ५ हजार ८६२ वर गेली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, गेल्या दहा वर्षात हरवलेल्या व्यक्तींपैकी ९६ हजार ७२३ जणांचा शोध घेण्यात आला असून ९ हजार १३९ व्यक्तींचा शोध लागला नसल्याचे मिसींग पर्सन ब्युरोने सादर केलेल्या एका अहवालातून निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, हरवणाऱ्या व्यक्तींमध्ये ३५ टक्के अल्पवयीन मुलांचा समावेश आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, यासंदर्भात शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले,

(५) तदनुसार उपरोक्त प्रकरणी आळा घालण्याबाबत व बेपत्ता व्यक्तींचा शोध घेण्याबाबत विशेष मोहिम राबविण्याबाबत तसेच संबंधित दोषींवर कारवाई करणेबाबत शासनस्तरावर काय कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०१-२०१९)** : (१) व (२) राज्यात सन २००५-२०१५ पर्यंत हरवलेल्या/बेपत्ता व्यक्तींची संख्या १,१६,१७४ इतकी आहे. त्यापैकी १,०७,८५६ इतक्या व्यक्तींचा शोध घेण्यात आला असून ८,३१८ व्यक्ती बेपत्ता आहेत.
(३) सन २००५-२०१५ पर्यंत हरवलेल्या १,१६,१७४ व्यक्तींपैकी ३६,३६७ म्हणजेच ३१.३०% अल्पवयीन मुलांचा समावेश आहे.
(४) व (५)

१) १८ वर्षाखालील हरविलेल्या लहान मुलांच्या बाबतीत मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.७५/२०१२, बचपन बचाव आंदोलन या संबंधाने दिनांक १०/०५/२०१३ रोजीच्या आदेशानुसार १८ वर्षाखालील हरविलेल्या मुलांबाबत अपहरणाचा गुन्हा (FIR) दाखल करण्यात येतो.

२) हरविलेल्या लहान मुलांचा शोध घेण्याकरीता प्रमाणित कार्यपध्दती (SOP) तयार करण्यात आलेली असून हरविलेल्या मुलांच्या संदर्भात इंटरनेटवर केंद्र सरकारची www.trackthemissingchild.gov.in मुंबई पोलिसांची www.mumbaipolice.gov.in मुंबई रेल्वे पोलिसांची www.shodh.gov.in या वेबसाईट कार्यान्वित आहेत.

३) लहान मुलांचा शोध घेवून त्यांना त्यांचे कुटुंबियांकडे/पालकांकडे देण्याकरीता ऑपरेशन मुस्कान शोध मोहिमा वारंवार राबविण्यात येतात. आतापर्यंत सन २०१५ ते २०१८ या कालावधीत ऑपरेशन मुस्कानच्या ६ शोध मोहिमा राबविण्यात आल्या आहेत.

४) केंद्र शासनाने बेपत्ता झालेल्या मुले/महिला/मुली यांचा उपयोग अनैतिक व्यापाराकरीता होवू शकतो या कारणास्तव अनैतिक

व्यापारास प्रभावीपणे प्रतिबंध करण्याकरीता राज्याचे समन्वय अधिकारी म्हणून विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची नेमणूक करण्यात आली आहे. तसेच १२ विशेष अनैतिक व्यापार प्रतिबंध कक्ष स्थापन करण्यात आले आहे. तसेच अनैतिक व्यापार प्रतिबंध कायदा, १९५६ च्या कलम १३ अन्वये शासन अधिनियम क्र. पीपीए ०२०६/सीआर-५७/विशा-६, दिनांक १४/०३/२००६ नुसार प्रत्येक पोलीस घटकातील पोलीस उपायुक्त/पोलीस अधिक्षक, सहायक पोलीस आयुक्त/पोलीस उपअधिक्षक, पोलीस ठाणे/समाज सेवा शाखा/गुन्हे शाखा येथील पोलीस निरीक्षक यांना विशेष पोलीस अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे.

५) प्रत्येक जिल्ह्याच्या ठिकाणी हरवलेली मुले व मुली यांचा शोध घेण्याकरीता खाली नमूद उपाययोजना राबविल्या आहेत.

१. स्वतंत्र पथक तयार करून शोध मोहीम राबविण्यात येते.

२. स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग घेण्यात येवून समाजात प्रबोधनात्मक जनजागृती करण्यात येते.

३. अवागमनाचे ठिकाणी लक्ष ठेवून शोध मोहीम राबविण्यात येते.

४. हरवलेल्या व्यक्तींची माहिती प्राप्त करून पोलीस गॅझेटमध्ये प्रसिद्धीकरीता पाठविण्यात येते.

५. राज्य व जिल्हा पातळीवरील महत्वाचे वृत्त पत्रात तसेच दुरदर्शनवर बेपत्ता मुला-मुलींची माहिती पालकांच्या संमतीने देऊन शोध घेण्यात येतो.

(६) प्रश्न उद्भवत नाही.

## बांधकाम व्यावसायिक खोट्या दस्तऐवज नोंदवून सदनिका वितरीत करुन जनतेची फसवणूक करीत असल्याबाबत

**(३) ११९०४ (२३-१२-२०१५). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यामध्ये अनेक खाजगी वित्तीय संस्था वेगवेगळया योजनांच्या आधारे फसवणूक करुन कमी पैशात घर बुक करण्याचे अमिष दाखवून तसेच बांधकाम व्यावसायिक खोट्या दस्तऐवज नोंदवून सदनिका वितरीत करुन जनतेची फसवणूक करीत असल्याच्या घटना दिनांक १० मे, २०१५ रोजी वा त्यापूर्वीही अनेकदा निदर्शनास आल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ठाणे जिल्ह्यातील भिवंडी तालुक्यातील कशेळी, काल्हेर, पुर्णा, राहनाळ तसेच कल्याण तालुक्यातील कल्याण-शिळफाटा रोड तसेच रायगड जिल्ह्यातील कर्जत, पेण व रोहा तालुक्यातील बहुसंख्य बांधकाम शासनाच्या सक्षम प्राधिकरण संस्थांची पूर्व परवानगी न घेता बांधकाम व्यावसायिक विकासकाकडून अनधिकृत बांधकामे करण्यात येत असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, संबंधित बांधकाम व्यावसायिक/विकासक सदरचे बांधकाम अनधिकृत असताना ते अधिकृत असल्याचे भासवून व वित्तीय संस्थांकडून त्यासाठी कर्ज मंजूर होणार असल्याचे सांगून सदनिका खरेदीचे बुकींग-चार्ज व अन्य प्रक्रिया फी म्हणून लाखो रुपये वसूल करीत असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, सदर बांधकाम व्यावसायिक/विकासक हे बऱ्याच ठिकाणी बांधकामाचे बनावट दस्तऐवजाच्या आधारे दुय्यम निबंधक कार्यालयाकडून नोंदणी करुन घेवून त्याच आधारे कर्ज देखील मंजूर करुन घेत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, कालांतराने सदरचे बांधकाम हे अनधिकृत ठरल्याने ते पाडून टाकण्यात येते व त्यासाठी घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबतचा आर्थिक भूर्दंड हा सामान्य व गरीब सदनिका खरेदीदारास द्यावा लागत असल्याच्याही

तक्रारी संबंधित पोलीस यंत्रणा, महानगरपालिका, जिल्हाधिकारी तसेच प्रधान सचिव, महसूल विभाग व प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांचेकडे वारंवार करण्यात येत असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(६) असल्यास, याप्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय व त्यानुसार संबंधितांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०१-०२-२०१९) :** (१) राज्यामध्ये अनेक खाजगी वित्तीय संस्था वेगवेगळ्या योजनांच्या आधारे फसवणूक करुन कमी पैशात घर बुक करण्याचे आमिष दाखवून तसेच बांधकाम व्यावसायिक खोट्या दस्तऐवज नोंदवून सदनिका वितरीत करून जनतेची फसवणूक करीत असल्याच्या घटना निदर्शनास आल्याची बाब खरी आहे.
(२), (३), (४) व (५) भिवंडी, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका व रोहा, पेण, कर्जत, नगरपालिकांकडून प्राप्त अहवालानुसार अशा स्वरुपाची बाब निदर्शनास आलेली नाही.

मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून प्राप्त अहवालानुसार भिवंडी परिसर अधिसूचित क्षेत्रासाठी विशेष नियोजन प्राधिकरण म्हणून प्राधिकरणाची नियुक्ती केलेली आहे. सदर अधिसूचित क्षेत्रातील मौजे कशेळी, काल्हेर, पुर्णा व राहनाळ या गावातील अनधिकृत बांधकामासंदर्भात ४ प्रकरणी तसेच कल्याण- शिळफाटा रोड लगत २७ गावाच्या अधिसूचित क्षेत्रातील मौजे काटई, सोनार पाडा व गोळीवली या गावातील ४ अनधिकृत बांधकामासंदर्भात ४ प्रकरणी महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६ च्या कलम ५३(१) अन्वये संबंधिताना नोटीसा बजावल्या आहेत.

पुर्णा, ता.भिंवडी, जि.ठाणे येथे कमी किंमतीत सदनिका देण्याचे आमिष दाखवून फसवणूक केल्या प्रकरणी नारपोली पोलीस स्टेशन येथे गुन्हा दाखल करण्यात आला असून दोषारोप पत्र न्यायालयात दाखल केले आहे.

ठाणे पोलीस आयुक्तालयाच्या अंतर्गत नारपोली पोलीस स्टेशन येथे प्राप्त तक्रारीनुसार सन २०१४ मध्ये गुन्हा रजिस्टर नं. ४२३/२०१४ दाखल करण्यात आला असून दोषारोप पत्र न्यायालयात दाखल केले आहे.
(६) राज्यात कमी पैशात घर बुक करण्याचे आमिष दाखवून तसेच बांधकाम व्यावसायिक खोट्या दस्तऐवज नोंदवून सदनिका वितरीत करुन जनतेची

फसवणूक केल्यासंदर्भात पोलीस विभागास तक्रारीच्या अनुषंगाने सन २०१० मध्ये ०१ गुन्हा, सन २०१३ मध्ये ०१ गुन्हा, सन २०१४ मध्ये ०९ गुन्हे, सन २०१५ मध्ये ४० गुन्हे दाखल करण्यात येवून कायदेशीर कारवाई करण्यात आली आहे.

---

## राज्यातील अनेक शाळांमध्ये शिक्षकांची वैयक्तिक मान्यता घेतल्या जात नसल्याबाबत

**(४) १४१५१ (२२-१२-२०१५). श्री.अमरिशभाई पटेल, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अनेक शाळांमध्ये शिक्षकांची वैयक्तिक मान्यता घेतली जात नसल्यामुळे अशा शिक्षकांना नोकरीतून कोणत्याही वेळेस काढून टाकले जाते व तसेच त्यांना रुपये ५ ते १० हजार इतके अल्प मानधन दिले जात आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, इंग्रजी माध्यमातील कायम विनाअनुदानित शिक्षकांच्या समस्या सोडविण्यासाठी शिक्षक संघटनेने दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१५ रोजी वा त्यासुमारास मा.शालेय शिक्षण मंत्री यांना निवेदन दिले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणता धोरणात्मक निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१६) :** (१), (२), (३) व (४) महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियम, १९८१ नुसार खाजगी अनुदानित शाळांमधील शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या संस्थेकडून केल्या जातात. सदरच्या नियुक्त्या विहित कार्यपध्दतीनुसार नसल्यास त्यास संबंधित शिक्षणाधिकारी यांचेकडून वैयक्तिक मान्यता दिली जात नाही. वैयक्तिक मान्यतेबाबत वेळोवेळी शासनाने मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.

---

## शासनाच्या विविध विकास कामांचा निधी जिल्हा बँकेत ठेवण्याबाबत

**(५) १८८८२ (२७-०४-२०१६). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील जिल्हा बँकांना सक्षम करावयाच्यादृष्टीने शासनाच्या विविध विकास कामांचा निधी जिल्हा बँकेत ठेवण्याबाबत धुळे व नंदुरबार जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक यांनी माहे ऑगस्ट, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान एका पत्राद्वारे मा.मंत्री, सहकार यांच्याकडे मागणी केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त मागणीबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२८-०१-२०१९) :** (१) होय.

(२) राज्यामध्ये ३१ जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका आहेत. सदर बँकांचे कर्जापैकी ढोबळ NPA प्रमाण ३६.९५ % आहे. त्यापैकी ५ बँका तोट्यात असून तीन बँकांचा CRAR ९ % पेक्षा कमी आहे. काही जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका अडचणीत आल्याने व सदरच्या बँकामध्ये जिल्हा परिषद/ पंचायत समिती तसेच विविध योजनांचा निधी अडकून पडल्याने काही जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांची खाती राष्ट्रीयकृत बँकात उघडण्यात आली आहे. जि.म.स. बँकांच्या आर्थिक स्थितीत गुणात्मक वाढ झाल्यास शासन या मागणीचा गांभीर्यपूर्ण विचार करेल.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वाशिम जिल्हयातील पोलीस भरती प्रक्रियेमधील प्रतिक्षा सुचीवरील उमेदवारांना नियुक्ती आदेश न दिल्याबाबत

**(६) १९४६१ (१९-०८-२०१६). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाशिम जिल्हयात सन २०१४ मध्ये करण्यात आलेल्या पोलीस भरती प्रक्रियेमध्ये ११६ उमेदवारांची निवड होऊन त्यापैकी १०८ उमेदवारांच्या

नियुक्तीचे आदेश निर्गमित करण्यात आले होते त्यापैकी उर्वरित ८ उमेदवार अन्य कारणांमुळे पोलीस सेवेत भरती होऊ शकले नाहीत सेवेत दाखल न होणाऱ्या सदर ८ उमेदवारांच्या जागी प्रतिक्षा सुचीवरील उमेदवारांची नियुक्ती करणे शासन आदेशानुसार बंधनकारक आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, प्रतिक्षा सुचीवरील प्रथम दावेदार असलेल्या सर्वश्री गजानन राऊत (माजी सैनिक), दिपक भडांगे (खेळाडू) व विठ्ठल सुर्वे या उमेदवारांनी जिल्हा पोलीस अधिक्षक, वाशिम यांच्याकडे त्यांच्या नियुक्तीची मागणी केली असता उमेदवारांना खेळाडू प्रमाणपत्र व तत्संबंधित कागदपत्राची पूर्तता केल्यानंतर त्यांची दिनांक २१ ऑक्टोबर, २०१५ रोजी वाशिम येथील जिल्हा सामान्य रुग्णालयात वैद्यकीय चाचणी देखील करण्यात आली होती, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, या उमेदवारांना अद्याप नियुक्तीचे आदेश देण्यात न आल्यामुळे त्यांनी माहे फेब्रुवारी, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान विशेष पोलीस निरीक्षक, अमरावती परिक्षेत्र यांची भेट घेतल्यानंतर व विशेष पोलीस महानिरीक्षकांनी ७ दिवसात अहवाल सादर करण्याचे आदेश जिल्हा पोलीस अधिक्षक, वाशिम यांना देऊनही त्याबाबतचा अहवाल अद्याप पाठविण्यात आला नसल्याचे दिनांक ११ मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले असून याबाबत शासनाने चौकशी करून कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२४-०१-२०१९) :** (१) सन २०१४ च्या भरती प्रक्रियेत ११६ उमेदवारांपैकी ११० उमेदवारांना नियुक्ती देण्यात आलेली आहे.

(२) होय.

(३) व (४) याप्रकरणी सर्वश्री गजानन राऊत (माजी सैनिक), दिपक भडांगे (खेळाडू) व विठ्ठल सुर्वे या तीन उमेदवारांना पोलीस शिपाई पदावर नियुक्ती देण्यास शासनाने मान्यता दिल्याचे व त्यानुसार पुढील योग्य ती कार्यवाही करण्याबाबत अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई व पोलीस अधिक्षक, वाशिम यांना कळविण्यात आले आहे.

___________

## खाजगी अनुदानित प्राथमिक शाळांमधील शिक्षकेतरांची पदे रद्द न करण्याबाबत

**(७) २०२७६ (२३-०८-२०१६). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर : तारांकित प्रश्न क्रमांक १५९९० ला दिनांक ५ एप्रिल, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील खाजगी अनुदानित प्राथमिक शाळांमधील शिक्षकेतरांची पदे रद्द न करण्याबाबतचा विषय सभागृहात चर्चेला आला होता, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर विषयाचा निर्णय होण्यासाठी शासनाने शिक्षण आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली समिती गठित करण्याचे मान्य केले होते, हे खरे आहे काय,

(३) असल्यास, याबाबतची समिती गठित झाली आहे काय,

(४) नसल्यास, शासनाने आश्वासन देवूनही समिती गठित न करण्याची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) राज्यातील मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांकरीता शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी सुधारित आकृतिबंधाचा शासन निर्णय, दिनांक २८/०१/२०१९ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

---

## मराठवाडा विभागातून स्थलांतरीत झालेल्या दुष्काळग्रस्त कुटुंबियांना रोजगार, अन्नधान्य व निवारा पुरविण्याबाबत

**(८) २१२४८ (१९-०८-२०१६). श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, श्री.प्रकाश गजभिये, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मराठवाडा विभागातील विशेषत: जालना, उस्मानाबाद, अहमदनगर, औरंगाबाद व परभणी जिल्हयातील दुष्काळग्रस्त कुटुंबे मुंबई तसेच ठाणे येथे मोठ्या प्रमाणात स्थलांतरीत झाली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,
(३) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार सदर दुष्काळग्रस्तांना रोजगार, अन्नधान्य व निवारा पुरविणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२२-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## बालकांचा मोफत व सक्तीच्या अधिकार अधिनियमानुसार इयत्ता ५ वी च्या वर्गाला २ शिक्षक मंजूर करण्याबाबत

**(९) २२७१९ (२३-०८-२०१६). श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणावरील अधिकार अधिनियम, २००९ प्रमाणे इयत्ता १ ते ५ पर्यंतच्या शाळेत ६० पर्यंत विद्यार्थी पट असल्यास, शिक्षकांची २ पदे मंजूर होतात, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, इयत्ता ५ ते १० च्या माध्यमिक शाळेतील इयत्ता ५ मध्ये १ ते १९ विद्यार्थ्यांसाठी एकही पद मंजूर करण्यात आले नाही, हे खरे आहे काय,
(३) असल्यास, या संदर्भातील शासन निर्णय दिनांक २८ ऑगस्ट, २०१५ हा सदर अधिनियमातील तरतुदींशी विसंगत ठरत असल्यामुळे इयत्ता ५ वी च्या वर्गातील, १ ते १९ पटसंख्या असलेल्या शाळांतील सुमारे पाच हजार शिक्षकांची पदे व्यपगत होऊन सुमारे ५०००० विद्यार्थ्यांचे नुकसान होण्याची शक्यता निर्माण झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सदर अधिनियमानुसार ६० पर्यंत पट असलेल्या इयत्ता ५ वी च्या वर्गाला २ शिक्षक मंजूर करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा अधिकार, २००९ च्या अनुषंगाने सर्व व्यवस्थापनाच्या (स्थानिक स्वराज्य संस्था, शासकीय, खाजगी अनुदानित, अंशतः अनुदानित इ. सर्व) नविन शाळा सुरु करणे, वर्ग जोडणे त्यानुषंगाने शाळांमधील संरचनात्मक बदल करणेचे सुधारित निकष दिनांक २८ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये विहीत करण्यात आले आहेत.

---

## राज्यात शीतगृहांची साखळी उभारण्याबाबत

**(१०) २३२८७ (१६-०८-२०१६). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **पणन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नॅशनल सेंटर फॉर कोल्ड चेन डेव्हलपमेंट च्या अहवालानुसार राज्यात ६२.७३ लाख मेट्रीक टन क्षमतेच्या शीतगृहाची आवश्यकता असताना केवळ ७.६२ लाख क्षमतेच्या शीतगृहाची उभारणी केली असून यात ५५ लाख मेट्रीक टनांची तफावत असल्याचे माहे जून, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर तफावत दूर करुन पायाभूत शीतगृहांची साखळी उभारण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०२-०२-२०१९) :** (१) व (२) CDC (National Center for cold chain development) यांच्या Overview on cold chain development (२०१५) च्या अहवालात महाराष्ट्र राज्यात एकूण ७,६२,७९७ मे.टन क्षमता निर्माण करणेची गरज आहे, असे नमूद केले आहे.

महाराष्ट्र राज्यात वखार महामंडळाचे पनवेल, जि.रायगड येथे ५,००० मे.टनाचे शितगृह उपलब्ध आहे. तसेच, पणन मंडळाच्या ४४ निर्यात सुविधा केंद्रात प्रशितकरण - २२५ मे.टन, शितगृह - १९१९ मे.टन व रायपनिंग चेंबर - २०० मे.टन क्षमता निर्माण करण्यात आलेली आहे.

तसेच राष्ट्रीय कृषी विकास योंजनेंतर्गत ९ ठिकाणी एकूण ९,००० मे.टन साठवणूक क्षमता निर्माण करण्याचे वखार महामंडळाचे नियोजन आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात दारुबळीच्या घटनांना प्रतिबंध घालणेबाबत

**(११) २४८२९ (०४-०१-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राष्ट्रीय गुन्हे नोंदणी विभागाच्या सन २०१५ च्या अहवालातुन देशात महाराष्ट्र राज्यात सर्वाधिक दारुबळी होतात असे दिनांक ३१ मे, २०१६ रोजी व त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, लैंगिक शोषण, बलात्कार, अपघात अशा प्रकारचे अनेक गुन्हे मद्याच्या अंमलाखाली असणाऱ्यांकडून होतात असे मा.मुख्यमंत्री यांनी माहे ऑक्टोबर, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निवेदन केले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले, तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (३१-०१-२०१९) :** (१), (२) व (३) गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे यांनी सादर केलेल्या अहवालाप्रमाणे राष्ट्रीय गुन्हे नोंदणी विभागाच्या अहवालानुसार बेकायदेशीर/बनावट दारुचे सेवन केल्यामुळे राज्यात सन २०१५ मध्ये एकूण २७८ व्यक्ती मृत्यू पावल्या आहेत.

राज्यात अवैध दारु धंद्यासंदर्भात करावयाच्या प्रतिबंधात्मक कार्यवाहीबाबत सर्व पोलीस घटक प्रमुख व अधिक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांना शासन परिपत्रक दिनांक ०१/०३/२०१७ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

तसेच अवैध दारु विक्रेत्यांवर ३ वेळा विशेष मोहिम राबवून धडक कारवाई (Operation Crack Down) करण्यात आली आहे. सदर कार्यवाही ही एप्रिल, २०१७, जून, २०१७ व नोव्हेंबर, २०१७ या कालावधीत करण्यात आली. सदर कालावधीत एकूण ३४००५ कारवाई करण्यात आली. तसेच २२४५० आरोपींना अटक करण्यात आली असून प्रतिबंधक कार्यवाही करुन प्रभावी उपाययोजना केली आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## आकृतिबंधापूर्वी नियुक्ती केलेल्या अनुसूचित जाती जमातीच्या शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वैयक्तिक मान्यतेचे प्रस्ताव प्रलंबित असल्याबाबत

**(१२) २६०२९ (१६-१२-२०१६). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सोलापूर जिल्ह्यातील अशासकीय अनुदानित शाळेत दिनांक २५/११/२००५ पूर्वी (आकृतिबंध लागू करण्यापूर्वी) नियुक्ती केलेल्या अनुसूचित जाती, जमातीच्या शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे वैयक्तिक मान्यतेचे प्रस्ताव प्रलंबित आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, किती प्रस्ताव मान्यतेसाठी प्रलंबित आहेत,

(३) असल्यास, डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या शतकोत्तर रोप्य महोत्सवी वर्ष साजरा करत असताना अशा वंचित अनुसूचित जाती जमातीच्या नियुक्त कर्मचाऱ्यांच्या प्रलंबित वैयक्तिक मान्यता देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) राज्यातील मान्यताप्राप्त खाजगी अनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांकरीता शिक्षकेतर कर्मचाऱ्यांसाठी सुधारित आकृतिबंधाचा शासन निर्णय दिनांक २८/०१/२०१९ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

---

## अतिरिक्त शिक्षण सेवकांना सेवेत नियमित करणेबाबत

**(१३) २६२१२ (१६-१२-२०१६). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील खाजगी अनुदानित प्राथमिक व माध्यमिक शाळेतील अतिरिक्त शिक्षकांचे निश्चितीकरण झाले आहे काय,

(२) असल्यास, सर्व अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन अन्य शाळातून पूर्ण झाले आहे काय,

(३) नसल्यास, अतिरिक्त पदांचे कारण दाखवून शिक्षण सेवकांना सेवामुक्त करण्याची शीघ्रता शीघ्र कार्यवाही का करण्यात आली,
(४) असल्यास, अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन पूर्ण होईपर्यंत बहुतांशी शिक्षणसेवक सेवेत कायम झाले असते, हे खरे आहे काय,
(५) असल्यास, अशा शिक्षण सेवकांना शासन सेवेत कार्यरत समजून त्यांच्या सेवा नियमित होतील काय ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३), (४) व (५) राज्यातील अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन करण्याची कार्यवाही सुरु आहे. अतिरिक्त ठरणाऱ्या शिक्षण सेवकांचे समायोजन शासन निर्णय दिनांक २७ जून, २०१६ नुसार करण्यात येत आहे.

---

## झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरणाने बृहन्मुंबई महानगरपालिकेमध्ये दिलेल्या एल.ओ.आय. ची माहिती देण्याबाबत

**(१४) २६६२० (०४-०१-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) झोपडपट्टी पुनर्विकास प्राधिकरणाने बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात झोपडपट्टी पुनर्विकास प्रकल्पांना दिनांक १ एप्रिल, २००१ ते ३१ मार्च, २०१४ या काळात प्रत्येक वर्षी किती प्रकल्पांना एल.ओ.आय दिले,
(२) त्यापैकी किती प्रकल्पांमध्ये किती झोपडपट्टीधारकांना किती घरे देण्यात आली,
(३) किती प्रकल्पांमध्ये अजिबात घरे दिली नाहीत,
(४) ज्या प्रकल्पामध्ये घरे दिली नाहीत त्यापैकी कितीमध्ये विकासकांनी विक्रीसाठी बांधलेली घरे विकली आहेत,
(५) प्रत्येक वर्षी दिलेल्या एकूण किती जणांना घरे देण्यात आलेली नाहीत ?

**श्री.प्रकाश महेता (०२-०२-२०१९) :** (१) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाने बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रात दिनांक ०१/०४/२००१ ते दिनांक

३१/०३/२०१४ पर्यंत एकूण १०८८ एल.ओ.आय. दिले असून, वर्षनिहाय तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| **अ.क्र.** | **वर्ष** | **आशयपत्र (एल ओ आय) ची संख्या** |
|---|---|---|
| १. | ०१/०४/२००१ ते ३१/०३/२००२ | ६१ |
| २. | ०१/०४/२००२ ते ३१/०३/२००३ | ६६ |
| ३. | ०१/०४/२००३ ते ३१/०३/२००४ | ७१ |
| ४. | ०१/०४/२००४ ते ३१/०३/२००५ | ७७ |
| ५. | ०१/०४/२००५ ते ३१/०३/२००६ | १०३ |
| ६. | ०१/०४/२००६ ते ३१/०३/२००७ | ११२ |
| ७. | ०१/०४/२००७ ते ३१/०३/२००८ | २१३ |
| ८. | ०१/०४/२००८ ते ३१/०३/२००९ | ६३ |
| ९. | ०१/०४/२००९ ते ३१/०३/२०१० | १२३ |
| १०. | ०१/०४/२०१० ते ३१/०३/२०११ | ५८ |
| ११. | ०१/०४/२०११ ते ३१/०३/२०१२ | ४१ |
| १२. | ०१/०४/२०१२ ते ३१/०३/२०१३ | ४८ |
| १३. | ०१/०४/२०१३ ते ३१/०३/२०१४ | ५२ |
| | **एकूण आशयपत्र (LOI)** | **१०८८** |

(२) दिनांक ३१/०३/२०१४ पर्यंत २५० प्रकल्पांना ताबा प्रमाणपत्र देण्यात आले आहे. सुमारे ९२३५९ सभासदांना सदनिका देण्यात आल्या आहेत.

तद्नंतरच्या २०२ आशयपत्रामधील ३०८६५ घरांना मंजूरी दिली आहे. तसेच या कालावधीत ३५३०८ सभासदांना घरे दिलेली आहेत. सभासदांना दिलेल्या घरांची संख्या ही वरील दिनांक ०१/०४/२०१७ नंतरची असली तरी ही त्यातील घरांची मंजूरी ही दिनांक ३१/०३/२०१४ पुर्वीच्या व तद्नंतरच्या LOI मधील आहे.

(३), (४) व (५) प्रश्न भाग-१ व २ च्या उत्तराच्या अनुषंगाने प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील नवीन उच्च माध्यमिक शाळांचा बृहत आराखडा तयार करणेबाबत

**(१५) २६६३६ (१६-१२-२०१६). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात नवीन उच्च माध्यमिक विद्यालय सुरु करणेसाठी बृहत आराखडा तयार करणेबाबत सन २०१३ मध्ये जनतेकडून हरकती, आक्षेप व सूचना मागविण्यात आल्या होत्या, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर हरकती, आक्षेप व सूचना नुसार विभागीय शिक्षण उपसंचालक मुंबई, पुणे, नाशिक व कोल्हापूर यांनी योग्य त्या शिफारशीसह बृहत आराखड्यात गावांचा समावेश करण्याबाबत शिक्षण संचालनालयास कळविले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शिक्षण संचालनालयाच्या शिफारशीनुसार सन २०१३ मधील नवीन उच्च माध्यमिक शाळांना परवानगी देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विनोद तावडे (१९-०१-२०१९) :** (१) नाही. राज्यात महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ दिनांक १९ जानेवारी, २०१३ पासून लागू असून त्यानुसार उच्च माध्यमिक शाळेस परवानगीबाबत अर्ज करता येतो.

(२) व (३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सावकारी कायद्याच्या अध्यादेशातील अट शिथील करण्याबाबत

**(१६) २९३२३ (११-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सावकारग्रस्त शेतकऱ्यांना दिलासा देण्याच्यादृष्टीने शासनाने दिनांक १० एप्रिल, १०१६ रोजी काढलेल्या अध्यादेशामधील अट शिथील करण्याची मागणी अकोला जिल्हाधिकाऱ्यांनी शासनाकडे दिनांक ३१ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास केली असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अकोला जिल्हाधिकाऱ्यांच्या पत्रातील मागण्यांचे स्वरुप काय आहे, त्यावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२४-०१-२०१९) :** (१) नाही.
(२) विदर्भ व मराठवाड्यातील शेतकऱ्यांनी परवानाधारक सावकारांकडून घेतलेले कर्जास माफी देण्यासाठी दिनांक १०/०४/२०१५ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला असून सदर शासन निर्णयातील कार्यक्षेत्राची अट शिथील करण्याची विनंती जिल्हाधिकारी, अकोला यांनी त्यांच्या दिनांक ३०/०७/२०१५ रोजीच्या पत्रान्वये केली होती.

त्यानुषंगाने सदर क्षेत्रमर्यादा शिथील करण्याची बाब शासनस्तरावरुन विचाराधीन आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वाघोली (जि.पुणे) येथील जिल्हा परिषदेच्या शाळेतील शिक्षकाने आत्महत्या केल्याबाबत

**(१७) ३१५७२ (१८-०८-२०१७). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वाघोली (जि.पुणे) येथील जिल्हा परिषदेच्या शाळेतील श्री.जीवन वाघमारे या शिक्षकाने दिनांक २५ एप्रिल, २०१७ रोजी वा त्यासुमारास विष पिऊन आत्महत्या केली, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याप्रकरणी शिक्षण अधिकारी, पुणे यांनी चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले,
(३) असल्यास, चौकशीच्या अनुषंगाने श्री.जीवन वाघमारे यांच्या आत्महत्येस जबाबदार असणाऱ्यांविरुध्द शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (०२-०२-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) सदर प्रकरणी श्रीम.ज्योती परिहार, गट शिक्षणाधिकारी, पंचायत समिती हवेली यांचेविरुध्द कर्जत पोलीस स्टेशन, जि.अहमदनगर येथे भा.दं.वि. कलम ३०६ अन्वये गुन्हा दाखल करण्यात आलेला आहे.

यासंदर्भात विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे यांच्यामार्फतदेखील एका त्रयस्थ इसमाच्या तक्रार अर्जावर चौकशी करण्यात आली होती. मात्र तक्रारदाराने अर्जासोबत पुरावा दिलेला नसल्याने चौकशी करता आली नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बीड जिल्हा परिषदेतील शिक्षकांचे बिंदुनामावली प्रमाणे समायोजन करण्याबाबत

**(१८) ३३९४१ (११-०८-२०१७). श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बीड जिल्हा परिषदेत मागील दोन वर्षापासून शिक्षकांचे बिंदुनामावलीप्रमाणे समायोजन झाले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, बिंदुनामावलीप्रमाणे समायोजन न करण्याची कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन बिंदुनामावलीप्रमाणे समायोजन कामात दिरंगाई करणाऱ्या अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२), (३) व (४) बिंदू नामावल्या दुरुस्त करुन तपासून घेण्याच्या सूचना संबंधितांना देण्यात आल्या आहेत व दोषींवर कारवाई करण्यात येत आहे.

---

## अल्पसंख्यांक व्यवस्थापनाच्या शाळांतील अतिरिक्त शिक्षकांना सेवेचे संरक्षण देण्याबाबत

**(१९) ३४०७० (१८-०८-२०१७). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अल्पसंख्यांक व्यवस्थापनाच्या खाजगी अनुदानित शाळांना महाराष्ट्र खाजगी शाळा कर्मचारी (सेवाशर्ती) अधिनियम १९७७ व नियमावली १९८१ लागू असून नियमावली १९८१ मधील नियम २६ व २७ अंतर्गत अतिरिक्त शिक्षकांना लाभलेले सेवा संरक्षण अल्पसंख्यांक शाळेतील शिक्षकांना लागू आहेत काय,

(२) असल्यास, अधिनियमांतर्गत आलेल्या नियमावलीतील तरतुदीप्रमाणे लाभलेले सेवा संरक्षण दिनांक १३ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयातून काढून अल्पसंख्यांक संस्थांना भारतीय घटनेच्या कलम २९ व ३० अंतर्गत प्राप्त झालेला विशेषाधिकार शासन जतन करेल काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अल्पसंख्यांक व्यवस्थापनाच्या शाळांतील अतिरिक्त शिक्षकांना सेवेचे संरक्षण देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) अल्पसंख्यांक शाळेतील शिक्षकांचे समायोजन, वैयक्तिक मान्यता व पद भरतीबाबत शासन निर्णय दिनांक १३ जुलै, २०१६ नुसार कार्यवाही करण्यात येते.

---

## राज्यात विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देण्याबाबत

**(२०) ३४३९३ (१८-०८-२०१७). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील विविध शिक्षण संस्थांनी विद्यार्थ्यांना मिळणाऱ्या शिष्यवृत्तीमध्ये गैरव्यवहार केल्याचे तसेच शिष्यवृत्तीस पात्र विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मिळत नसल्याचे माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार पात्र विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मिळण्यासाठी कार्यवाही करुन शिष्यवृत्तीमध्ये गैरव्यवहार करणाऱ्या शिक्षण संस्थांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२३-०१-२०१९) :** (१) नाही.
(२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागामार्फत गुणवत्ता व आर्थिक निकषावर आधारित खालील शिष्यवृत्ती योजना राबविण्यात येतात :-

१. इ.५ वी व इ. ८ वी करीता शिष्यवृत्ती योजना.
२. आर्थिकदृष्ट्या मागासवर्गीय विद्यार्थ्यांना माध्यमिक शालान्त परिक्षोत्तर कनिष्ठ महाविद्यालयीन स्तरावरील गुणवत्ता शिष्यवृत्ती (इ. ११ वी, इ. १२ वी)
३. संस्कृत शिष्यवृत्ती (इ. ९ वी ते इ.१२ वी)
४. राष्ट्रीय इंडियन मिलीटरी कॉलेज डेहराडून येथील इ. ९ वी ते इ.१२ वी करीता महाराष्ट्रातील विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती.
५. कनिष्ठ महाविद्यालयीन स्तरावर देण्यात येणारी राज्य शासनाची खुली गुणवत्ता शिष्यवृत्ती.

उपरोक्त शिष्यवृत्ती क्र.१ व क्र. ४ ची रक्कम विद्यार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्यात येते. क्र. ३ व क्र.५ या शिष्यवृत्तीची तरतूद विभागीय शिक्षण उपसंचालकांना देण्यात येते व विभागीयस्तरावरुन जिल्हयांना सदर तरतूदीचे वाटप करण्यात येते. क्र. २ च्या शिष्यवृत्तीची तरतूद संचालनालयस्तरावरुन जिल्हयांना देण्यात येते. शालेय शिक्षण विभागाच्या कोणत्याही शिष्यवृत्त्या या शैक्षणिक संस्थांना देण्यात येत नाहीत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

## राज्यात सन २००३-१४ ते २०१०-११ पर्यंतच्या नियुक्ती मिळालेल्या पदांवरील वाढीव पदांना वेतन देण्याबाबत

**(२१) ३५८४६ (०२-०१-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन २००३-१४ ते सन २०१०-११ पर्यंतच्या नियुक्ती मान्यता मिळालेल्या १७१ पायाभूत पदांवरील वाढीव पदांच्या आर्थिक तरतूदीसाठी वित्त विभागाशी चर्चा करुन त्यांना दिवाळीपर्यंत वेतन देण्यासाठी कार्यवाही करण्यात येईल, असे आश्वासन मा.शालेय शिक्षण मंत्री यांनी दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत कोणतीच कार्यवाही करण्यात न आल्याने वेतन मिळाले नसल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन उक्त पदांना त्वरीत वेतन मिळण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) राज्यातील खाजगी मान्यता प्राप्त अनुदानित उच्च माध्यमिक व कनिष्ठ महाविद्यालयातील सन २००३-०४ ते २०१०-११ या वर्षामधील मान्यता दिलेल्या व कार्यरत असलेल्या शिक्षकांच्या वाढीव पदांना वेतनाची रक्कम प्रदान करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक ५ ऑक्टोबर, २०१८ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

---

## संच मान्यतेनुसार वाढीव पदांना मान्यता देण्याबाबत

**(२२) ३७१६४ (०२-०१-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील, श्री.शरद रणपिसे, श्री.आनंदराव पाटील, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, आर्कि.अनंत गाडगीळ :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शाळांमध्ये आर.टी.ई. व संचमान्यतेच्या निकषानुसार विद्यार्थी संख्या कमी झाल्यास शिक्षक पद कमी होते, परंतु विद्यार्थी संख्या वाढली असता शिक्षक पद मंजूर होत नसल्याचे नुकतेच निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संच मान्यतेनुसार वाढीव पदांना मान्यता देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२) व (३) संचमान्यतेनुसार वाढीव पदांवर समायोजनाने अतिरिक्त शिक्षक उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही सुरु आहे.

---

## राज्यातील दुष्काळग्रस्त जिल्ह्यांना मदत करण्याबाबत

**(२३) ३७४०८ (०३-०१-२०१८). श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.अमरनाथ राजूरकर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.सुभाष झांबड, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) केंद्र शासनाच्या नॅशनल ॲग्रीकल्चर ॲण्ड डॉट असेसमेंट सिस्टीमने दरमहा तयार केला जाणारा अहवाल दिल्लीतील नॅशनल क्रॉप फोरकास्ट सेंटर (एनसीएफसी) तर्फे ऑगस्ट अखेरच्या पाऊस पाण्यानुसार जाहीर केलेल्या अहवालात देशातील २२५ जिल्ह्यांचा समावेश असून, यामध्ये राज्यातील मराठवाडा व विदर्भातील जिल्ह्यांचाही समावेश आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या अगोदर माहे ऑगस्ट, २०१७ मध्ये जो माहे जुलै, २०१७ चा अहवाल प्रसिध्द झाला त्यामध्ये दुष्काळाची प्राथमिक शक्यता वर्तविलेल्या जिल्ह्याची संख्या १०४ होती ती महिनाभरात दुप्पट झाली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दुष्काळग्रस्त जिल्ह्यांना मदत करण्याच्यादृष्टीने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२२-०१-२०१९) :** (१) व (२) दुष्काळ व्यवस्थापन संहिता २०१६ नुसार सन २०१७ च्या खरीप हंगामामध्ये राज्यातील दुष्काळी परिस्थितीचे मुल्यांकन करून महसूल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक ३० ऑक्टोबर, २०१७ अन्वये गोंदिया जिल्ह्यातील गोंदिया, तिरोडा व गोरेगांव या तालुक्यामध्ये मध्यम स्वरूपाचा दुष्काळ जाहीर करण्यात आला आहे.
(३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, दिनांक ८ फेब्रुवारी, २०१८ अन्वये सन २०१७ खरीप हंगामात दुष्काळ घोषित केलेल्या गोंदिया, तिरोडा व गोरेगांव या तीन तालुक्यांसाठी रूपये २७२०.७४ लक्ष निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कोल्हापूर जिल्हा परिषद व पंचायत समितीमध्ये कर्मचाऱ्यांची पदे रिक्त असल्याबाबत

**(२४) ३७७२४ (०४-०४-२०१८). श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **ग्रामविकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कोल्हापूर जिल्ह्यातील जिल्हा परिषद व पंचायत समितीमध्ये शासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांची अनेक पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर रिक्त पदे भरणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्रीमती पंकजा मुंडे (१२-०२-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.
(२) शासनाने दिनांक १६/०५/२०१८ च्या शासन निर्णयान्वये पदभरतीवरील निर्बंध काढून टाकल्याने त्याप्रमाणे जिल्हा परिषदेकडील गट-क संवर्गातील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही प्रस्तावित आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सेकंडरी स्कूल एम्लॉइज को ऑपरेटीव्ह क्रेडीट सोसा. मुंबई पत संस्थेच्या चौकशीबाबत

**(२५) ३८०५२ (०३-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले : तारांकित प्रश्न क्रमांक ३७२९७ ला दिनांक २२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सेकंडरी स्कूल एम्लॉइज को. ऑपरेटीव्ह क्रेडीट सोसा. मुंबई या शिक्षकांच्या पत संस्थेची मागील ८ महिन्यांपासून कलम ८८ नुसार चौकशी सुरू होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाकडून चौकशी पूर्ण झाली आहे काय, चौकशी अहवालाचे थोडक्यात स्वरुप काय आहे, त्यानुसार दोषी असलेल्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (३१-०१-२०१९) :** (१) होय.
(२) संस्थेच्या सभासदांनी केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम ८३ अन्वये चौकशी करण्यासाठी दिनांक २५/०२/२०१६ रोजी आदेश पारीत करण्यात आले.

सदर चौकशी अहवालामधील निष्कर्षानुसार संस्थेस झालेल्या आर्थिक नुकसानीची जबाबदारी निश्चित करण्यासाठी दिनांक २४/०३/२०१७ रोजीच्या आदेशान्वये अधिनियमाच्या कलम ८८ अन्वये चौकशी करण्यासाठी तत्कालीन उपनिबंधक, सहकारी संस्था, टी वॉर्ड, मुंबई यांची प्राधिकृत अधिकारी म्हणून नेमणूक करण्यात आली.

दरम्यान प्राधिकृत अधिकाऱ्यांनी कलम ८३ अन्वये सादर केलेल्या चौकशी अहवालाच्या विरुध्द संबंधित अपचारींनी मा.मंत्री (सहकार) यांचेकडे पुनर्रिक्षण अर्ज दाखल केला. त्यानुसार मा.मंत्री (सहकार) यांनी त्यांच्या दिनांक ५/०५/२०१८ रोजीच्या आदेशान्वये उपरोक्त चौकशी अहवाल रद्द केला असल्याने अधिनियमाच्या कलम ८८ अन्वये चौकशी करण्यात आलेली नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील अतिरिक्त शिक्षकांचे समायोजनाबाबत

**(२६) ३८८१९ (०५-०४-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात शालेय शिक्षण मंत्रालयाच्या निकषानुसार सर्व अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन झाले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, समायोजन बिंदूनियमावली व विषयांच्या रिक्त पदानुसार झाले आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शिक्षकांचे समायोजन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) राज्यातील अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांच्या अनुषंगाने सुरु आहे.

---

## राज्यातील पोलिसांच्या पाल्यांना इयत्ता दहावीपर्यंत मोफत शिक्षण देण्याचा प्रस्तावाबाबत

**(२७) ३९९७९ (०५-०४-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील पोलिसांच्या पाल्यांना इयत्ता दहावीपर्यंत मोफत शिक्षण देण्याचा प्रस्ताव गृह मंत्रालय आणि शिक्षण मंत्रालयाकडे पाठविल्याची माहिती माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रस्तावामुळे पोलिसांच्या पाल्यांना सन २०१८-१९ मध्ये मोफत शिक्षण देण्यात येणार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२३-०१-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यातील पोलिसांच्या पाल्यांना दहावीपर्यंत मोफत शिक्षण देण्याबाबतची मागणी प्राप्त झालेली नाही.

सद्यःस्थितीत शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक १३ जून, १९९६ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील मान्यता प्राप्त अशासकीय अनुदानित व विनाअनुदानित शिक्षण संस्थामधील मुलांना इयत्ता १ ली ते १० पर्यंतचे शिक्षण प्रमाणित दराने मोफत देण्यात येते, दिनांक ६ फेब्रुवारी, १९८७ च्या शासन निर्णयान्वये इयत्ता १ ली ते इयत्ता १२ वी पर्यंतचे शिक्षण मुलींना प्रमाणित दराने मोफत दिले जाते. सदर योजनांचा लाभ राज्यातील पोलिसांच्या पाल्यांना ही होतो. तसेच दिनांक २३/०१/२००९ व दिनांक २७/०७/२००९ च्या शासन निर्णयानुसार आंतकवादी/नक्षलवादीविरोधी हल्ल्यात मृत वा जखमी झालेल्या पोलीस अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पाल्यांना मोफत शिक्षणाची सवलत देण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बिलोली (जि.नांदेड) तालुक्यातील भूमी अभिलेख कार्यालयातील रिक्त पदे भरण्याबाबत

**(२८) ४०८५८ (०५-०४-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बिलोली (जि.नांदेड) तालुक्यातील भूमी अभिलेख कार्यालयातील पदे मागील दोन वर्षापासून रिक्त असल्यामुळे मोजणी व नकाशे काढणे इत्यादी कामांना विलंब होत असल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२३-०१-२०१९) :** (१), (२) व (३) उपअधिक्षक भूमि अभिलेख, बिलोली यांच्या कार्यालयात १७ पदांच्या मंजूर आस्थापनापैकी ९ पदे रिक्त आहेत. उपअधिक्षक भूमि अभिलेख, बिलोली कार्यालयातील भूकरमापकाच्या ३ रिक्त पदांपैकी भूकरमापकाचे १ पद सन २०१८ च्या नियतकालीक बदलीच्यावेळी भरण्यात आले आहे. प्रलंबित कामांचा निपटारा करण्याच्यादृष्टीने जिल्हा अधिक्षक भूमि अभिलेख, नांदेड यांच्यास्तरावरुन सदर कार्यालयास ०२ कर्मचारी प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

---

## मुंबई विद्यापीठाच्या रत्नागिरी उपकेंद्रात रेल्वे इंजिनिअरिंग व सिंधू स्वाध्याय हे अभ्यास सुरु करण्याबाबत

**(२९) ४१४७७ (०१-०८-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय:-

(१) मुंबई विद्यापीठाच्या रत्नागिरी उपकेंद्रात ‘रेल्वे इंजिनिअर’ तसेच ‘सिंधू स्वाध्याय’ हे अभ्यासक्रम सुरु करण्याबाबत शासनाने सन २०१५ मध्ये वा त्यादरम्यान घोषणा केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरचे दोन्ही अभ्यासक्रम सुरु झाले आहेत काय व कोणत्या शैक्षणिक वर्षापासून सुरु झाले आहेत,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अभ्यासक्रम सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच कार्यवाहीची सद्य:स्थिती काय आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२५-०१-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे. मुंबई विद्यापीठाच्या रत्नागिरी रेल्वे संशोधन केंद्राचे उद्घाटन तत्कालिन रेल्वेमंत्री श्री.सुरेश प्रभु यांच्या हस्ते झाले. सदर कार्यक्रमास मा.राज्यपाल, मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग हे हजर होते, यावेळी रेल्वे मंत्रालय व मुंबई विद्यापीठ यांच्या दरम्यान रत्नागिरी रेल्वे संशोधन केंद्रात रेल्वे अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रम सुरु करण्याबाबत करार झाला होता.तसेच मुंबई विद्यापीठामार्फत सदर उपकेंद्रात सिंधू स्वाध्याय अभ्यासक्रम सुरु करण्यात आला आहे.
(२) रत्नागिरी उपकेंद्रामध्ये विविध तांत्रिक अडचणींमुळे रेल्वे अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रम सुरु करता आलेला नाही. तथापि, सिंधू स्वाध्याय संस्थेमार्फत रत्नागिरी एम.एस्सी. प्राणीशास्त्र (सागरशास्त्र) हा अभ्यासक्रम सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षापासून सुरु करण्यात आला असून सदर पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम नियमित तत्वावर चालविला जात आहे.
(३) रत्नागिरी उपकेंद्रात रेल्वे अभियांत्रिकी पदवी अभ्यासक्रमासाठी प्रवेश हे संयुक्त प्रवेश परिक्षेच्या (Entrance Exam) माध्यमातुन होत असल्याने प्रवेशाबाबतचे धोरण रेल्वे मंत्रालयाकडून निश्चित होणे आवश्यक होते. याकरीता मुंबई विद्यापीठातील अधिकारी रत्नागिरी येथील रेल्वे अधिकाऱ्यांच्या संपर्कात होते. सदर अभ्यासक्रमासाठी रत्नागिरी उपकेंद्राच्या नवीन इमारतीतील एक मजला राखुन ठेवण्यात आला होता.तथापि, इतर महाविद्यालयात अभियांत्रिकी पदवी प्रवेशाची प्रक्रिया अंतिम टप्प्यात आली, तरीही सदर उपकेंद्रातील प्रवेशाबाबत रेल्वेकडून सूचना मिळाल्या नाही. अशा विविध तांत्रिक अडचणीमुळे रेल्वेचे अभ्यासक्रम सुरू करता आले नाहीत. परंतु त्यासाठी विद्यापीठ अजुनही प्रयत्नशील आहे. तर सिंधू स्वाध्याय

संस्थेमार्फत रत्नागिरी एम.एस्सी. प्राणीशास्त्र (सागरशास्त्र) हा अभ्यासक्रम सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षापासून रत्नागिरी उपकेंद्रात सुरु करण्यात आला आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील शिक्षकांच्या नियुक्तीत अनियमितता झाल्याबाबत

**(३०) ४२७८१ (०१-०८-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सन २०१० नंतर नियुक्त झालेल्या चार हजार पाचशे शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना नियुक्तीमधील अनियमितता या कारणास्तव त्यांची नियुक्ती अवैध ठरविण्यात येत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी नियुक्ती प्रक्रियेत कोणताही हस्तक्षेप नसलेले शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी दोषी ठरविण्यात आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन या शिक्षकांची नियुक्ती पुर्ववत करुन त्यांना न्याय देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, सदर कार्यवाही किती दिवसात पूर्ण होणे अपेक्षित आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) वैयक्तिक मान्यता देताना झालेल्या अनियमिततेच्या प्रकरणांची चौकशी आयुक्त (शिक्षण) यांचेस्तरावर सुरु असून सदर चौकशीअंती दोषी आढळणाऱ्या अधिकारी/कर्मचारी यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाईचा प्रस्ताव सादर करण्यात येत आहे.

---

## जयगड ते दाभोळ (जि.रत्नागिरी) गॅस पाईपलाईनला ग्रामस्थांनी विरोध केल्याबाबत

**(३१) ४३४७६ (०२-०८-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे : तारांकित प्रश्न क्रमांक ३५८८२ ला दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जयगड दाभोळ ही गॅस पाईपलाईन वाटद (जि.रत्नागिरी) कोंडवाडीच्या मध्यातूनच जात असल्याने या पाईपलाईनला येथील ग्रामस्थांनी विरोध केला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देसाई (११-०१-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

(२) मौजे वाटद ता.जि.रत्नागिरी मधील कोंडवाडीच्या मध्यातूनच गॅस पाईप लाईन जात असल्याच्या तक्रारी ग्रामस्थांनी पंचनामा करतेवेळी केल्या होत्या. मात्र ROU नकाशा पाहता वाटद येथील कोंडवाडीच्या मधून ROU मधून जमीन जात असल्याचे दिसत नाही. तथापि, वाडीपासून काही अंतरावर असणारी तीन घरे व एक शाळा यांच्यामधून गॅस पाईपलाईन जात असली तरी ROU च्या १८ मीटर बाहेर तीन घरे व शाळा आहे. याबाबत मे. एच. एनर्जी कंपनीने तांत्रिकदृष्टया गॅस पाईपलाईनची आखणी बदलता येणार नाही. असा खुलासा कंपनीने केला आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## आयसीटी योजनेंतर्गत आयसीटी लॅब पुरविण्यात आलेल्या शाळांना कंपनीकडून वीज देयकाची रक्कम अदा करण्याबाबत

**(३२) ४४१३९ (०५-१२-२०१८). श्री.दत्तात्रय सावंत, श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.बाळाराम पाटील : दिनांक २० जुलै, २०१८ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ५ मधील प्रश्न क्रमांक ३८२८० ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आयसीटी योजनेंतर्गत तिसऱ्या टप्प्यातील काही शाळांना आयसीटी लॅब पुरविण्यात आले असून आयसीटी लॅब पुरविण्यात आलेल्या सदर शाळांना वीज देयक पुरविण्यात येण्याची अट संबंधित कंपनीवर घालण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर आयसीटी लॅब पुरविण्यात आलेल्या शाळांना सदर कंपनीकडून वीज देयकाची रक्कम अदा न केल्याच्या तक्रारी प्राप्त झालेल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर वीज देयक न पुरविणाऱ्या कंपनीवर कारवाई करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२३-०१-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२) व (३) अशा प्रकारची तक्रार आढळून आलेली नाही. तथापि, आय.सी.टी.टप्पा-३ मधील सेवा पुरवठादार कंपन्यांनी सन २०१७-१८ मधील शाळांची वीज देयके निधीअभावी अदा केलेली नाहीत. यासाठीचा निधी उपलब्ध झाल्यावर प्रलंबित देयके अदा करण्यात येतील असे सदर कंपन्यांनी कळविले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शालेय शिक्षण विभागाच्या शिक्षक कर्मचाऱ्यांच्या पाल्यांना मोफत शुल्काची प्रतिपूर्ती देण्याबाबत

**(३३) ४४६६६ (०५-१२-२०१८). श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्री.हेमंत टकले, डॉ.सुधीर तांबे, श्री.दत्तात्रय सावंत : तारांकित प्रश्न क्रमांक ४१५९९ ला दिनांक २३ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील शालेय शिक्षण विभागाच्या शिक्षक कर्मचाऱ्यांच्या पाल्यांना मोफत शिक्षण योजनेंतर्गत दिल्या जाणाऱ्या व्यावसायिक अभ्यासक्रमाची शैक्षणिक शुल्काची प्रतिपूर्ती शिक्षण विभागाकडून केली जात नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी सदर शुल्काची प्रतिपूर्ती मंजूर करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२३-०१-२०१९) :** (१) नाही.
(२) शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक १९ ऑगस्ट, १९९५ च्या शासन निर्णयानुसार महाराष्ट्र राज्यातील अनुदानित व विनाअनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळेतील शिक्षक-शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या पाल्यांना पदव्युत्तर स्तरापर्यंत निःशुल्क शिक्षण योजना कार्यान्वित आहे. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार फ्री सीटमध्ये प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांनाच प्रमाणित दराने फी ची प्रतिपूर्ती देय आहे. सद्य:स्थितीत शासकीय, विनाअनुदानित व कायम विनाअनुदानित संस्थामध्ये वैद्यकीय, अभियांत्रिकी व इतर बऱ्याच व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेश प्रक्रिया परीक्षा (CET) घेऊन गुणवत्तेच्या आधारे केली जाते. त्यामुळे फ्री सीट प्रवेश पध्दत बंद झाली आहे.

सद्यःस्थितीत सदर योजना कार्यान्वित असून शासन पत्र दिनांक २१ एप्रिल, १९९८ व दिनांक २१ जानेवारी, २००३ च्या परिपत्रकान्वये ठरलेल्या प्रमाणित दरानुसार फीची प्रतिपूर्ती केली जाते. तसेच सदर योजनेकरीता उपलब्ध तरतूद संचालनालयस्तरावरुन जिल्ह्यांना ज्ञापनाद्वारे निर्गमित करण्यात आली आहे. तसेच उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या राजर्षी शाहू महाराज शिष्यवृत्ती योजनेंतर्गत आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांना शैक्षणिक शुल्क माफ केले जाते. उपरोक्त सवलतींचा लाभ शिक्षक कर्मचाऱ्यांच्या पाल्यांनाही घेता येईल.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जमीन वाटणी फेरफार कायद्याची अंमलबजावणी करण्याबाबत

**(३४) ४४९९८ (३०-११-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) जमिनीचे वाटप करण्यासाठी महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ च्या कलम ८५ नुसार कार्यवाही करुन ती सुविधा जिल्ह्यातील शेतकऱ्यांना उपलब्ध करून द्यावी अशी मागणी पुर्णा (जि.परभणी) तालुक्यातील वकील संघाने उपविभागीय अधिकारी, गंगाखेड (जि.परभणी) यांच्याकडे सन २०१८ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कलम ८५ प्रमाणे शेतकऱ्यांना वाटणी फेरबदल करण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी महसूल प्रशासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२९-०१-२०१९) :** (१) होय.
(२) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ८५ नुसार शेतकऱ्याने धारण केलेल्या शेतजमिनीमध्ये एकाहून अधिक सहधारक असतील तर अशा, तसेच एकत्र हिंदु कुटुंबाच्या मालकीच्या धारण जमिनीतील आपल्या हिश्याच्या/वाटणी विभाजनाकरीता जिल्हाधिकारी/तहसिलदार यांचेकडे अर्ज केल्यास, त्याप्रसंगी संबंधित सहधारकाकडे नोंदणीकृत वाटप-पत्राची मागणी करण्यात येऊ नये, अशा स्पष्ट सूचना शासन परिपत्रक क्र. जमीन ०७/२०१४/प्र.क्र.१३०/ज-१, दिनांक १६ जुलै, २०१४ अन्वये राज्यातील सर्व जिल्हाधिकारी, अपर जिल्हाधिकारी व तहसिलदार यांना देण्यात आल्या आहेत.

गंगाखेड उपविभागातील गंगाखेड, पूर्णा व पालम या तालुक्यातील कलम ८५ अंतर्गत जमीन वाटणीची एकूण २० प्रकरणे दाखल झाली आहेत. त्यापैकी ६ प्रकरणे निकाली काढण्यात आली असून उर्वरित १४ प्रकरणांत कार्यवाही सुरू आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

## राज्यातील ग्रामीण तसेच शहरी भागातील अल्पसंख्यांक समाजातील नागरिकांना विविध योजना मिळण्याबाबत

**(३५) ४५०८४ (३०-११-२०१८). डॉ.वजाहत मिर्झा, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.अमरनाथ राजूरकर, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **अल्पसंख्यांक विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील ग्रामीण तसेच शहरी भागातील अल्पसंख्यांक समाजातील नागरिकांकरीता अल्पसंख्यांक विकास विभागाकडून विविध योजनामार्फत देण्यात येत असलेला निधी योग्यरित्या दिला जात नसल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अल्पसंख्यांक विकास विभागाच्या कोणकोणत्या योजना आहेत व यासाठी किती निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अल्पसंख्यांक समाजाला सदर योजनांचा लाभ मिळण्याकरीता कोणकोणत्या उपाययोजना केल्या वा करण्यात येत आहेत,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२९-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) अल्पसंख्यांक विकास विभागामार्फ़त अल्पसंख्याकासाठी एकूण २७ योजना राबविण्यात येत असून त्याकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात रुपये ४२५.०० कोटी इतकी उपलब्ध करण्यात आली आहे. त्यापैकी नोव्हेंबर, २०१८ अखेर पर्यंत मागणीनुसार ११६.४९ कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला असून उर्वरित निधी वितरणाची कार्यवाही मागणीनुसार विभागस्तरावर सुरु आहे.

(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## विरार (ता.वसई, जि.पालघर) येथे विधी महाविद्यालय सुरु करण्याबाबत

**(३६) ४५१३७ (३०-११-२०१८). श्री.रविंद्र फाटक, ॲड.अनिल परब, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) विरार (ता.वसई, जि.पालघर) येथे विधी महाविद्यालय सुरु करण्यात यावे अशी मागणी स्थानिक लोकप्रतिनिधींनी शासनाकडे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी काय निर्णय घेण्यात आला आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२४-०१-२०१९) :** (१) होय

(२) व (३) महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ च्या कलम १०९ अन्वये नवीन महाविद्यालयांना मान्यता कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे. सदर कार्यपध्दतीनुसार मुंबई विद्यापीठाने शै.व. २०१९-२०२० करीता नवीन विधी महाविद्यालयाचे प्रस्ताव शासनास सादर केले असून त्यामध्ये विरार (ता.वसई, जि.पालघर) येथील प्रस्तावाचाही समावेश आहे. मुंबई विद्यापीठ व इतर अकृषी विद्यापीठांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांवर कार्यवाही सुरू आहे.

---

## अनुदानित शाळांच्या शिक्षकांचे समायोजनाबाबत

**(३७) ४५३२७ (०५-१२-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत, श्री.बाळाराम पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ४२४१७ ला दिनांक ९ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील १००% अनुदानित शाळांमधील विद्यार्थी संख्या कमी झाल्यास शिक्षकांना अतिरीक्त ठरविण्याची तरतूद एमईपीएस ॲक्ट तसेच शाळासंहितेमध्ये आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त धोरणानुसार अतिरिक्त शिक्षकांचे समायोजन इतरत्र होणे तसेच २०% अनुदानित शाळांच्या शिक्षकांना अतिरिक्त ठरविण्याबाबत शासनाचे धोरण स्पष्ट नसल्यामुळे शिक्षकांमध्ये असंतोष निर्माण झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून २०% अनुदानावर काम करणाऱ्या व अतिरिक्त ठरत असणाऱ्या शिक्षकांचे समायोजन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१) हे खरे आहे.

(२), (३) व (४) सद्य:स्थितीत राज्यातील १००% अनुदानित शाळेतील अतिरिक्त शिक्षकांच्या समायोजनाची कार्यवाही सुरु आहे.

---

## नेरळ (ता.कर्जत, जि.रायगड) येथील आदिवासी वसतिगृह इमारतीच्या जागेवर नवीन इमारत बांधण्याबाबत

**(३८) ४५६६८ (०५-१२-२०१८). श्री.रमेशदादा पाटील :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नेरळ (ता.कर्जत, जि.रायगड) येथील आदिवासी वसतिगृहांची इमारत गेल्या दहा वर्षापासून बंद अवस्थेत असून या मोडकळीस आलेल्या इमारतीच्या जागेवर नवीन इमारत बांधण्यास मंजुरी दिली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या जागेवर वसतिगृह बांधण्यासाठी आदिवासी विकास विभागाने गेल्या दोन वर्षापूर्वी चार कोटी रुपयांची तरतूद केली होती, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, दोन वर्षाचा कालावधी लोटूनही आदिवासी वसतिगृहाचे बांधकाम करण्यात आले नसल्याची बाब दिनांक ६ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आली आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले तसेच सदरहू इमारत किती कालावधीत बांधण्यात येणार आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (३१-०१-२०१९) :** (१), (२), (३) व (४) मौजे नेरळ ता.कर्जत येथील न.भु.क्र. २२४ अ येथे मुलींच्या वसतिगृहाची जुनी व मोडकळीस असलेली इमारत पाडण्यात आली आहे. त्याजागेवर आदिवासी मुलींचे शासकीय वसतिगृहाच्या नवीन इमारतीचे बांधकाम करण्यासाठी जिल्हाधिकारी रायगड यांनी जिल्हा नियोजन समिती योजनेमधून दिनांक २१/०१/२०१६ अन्वये रुपये ३९९.०० लक्ष किंमतीस प्रशासकीस मंजूरी दिलेली आहे. सदर बांधकाम कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल यांचेकडून करण्यात येत होते. तद्नंतर आदिवासी विकास विभागाद्वारा आश्रमशाळा व वसतिगृह इमारत बांधकामासाठी स्वतंत्र बांधकाम व्यवस्थापन कक्ष स्थापन करण्यात आला. सदरचे काम कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल यांनी आदिवासी विकास विभागाकडील बांधकाम व्यवस्थापन कक्षाकडे दिनांक २५/०१/२०१७ रोजी हस्तांतर केले. सदर अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, आदिवासी विकास विभाग बांधकाम व्यवस्थापन कक्ष यांनी दिनांक २३/०१/२०१८ रोजी तांत्रिक मंजूरी दिली आहे. या कामाचे कार्यादेश दिनांक ७/०८/२०१८ रोजी देण्यात आलेले असून दिनांक ६/०९/२०१८ रोजी नेरळ येथील वसतिगृह बांधकामाचे भूमिपुजन झाले. सध्या प्लींथ लेवलचे काम सुरु करण्यात आले आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पालघर जिल्हयातील वसई तालुक्याचे विभाजन करण्याबाबत

**(३९) ४५८४८ (३०-११-२०१८). ॲड.अनिल परब, श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वाढती लोकसंख्या, महापालिकेची निर्मिती इ. कारणांमुळे वसई (जि.पालघर) तालुक्याचे विभाजन करण्याबाबतचा प्रस्ताव माहे फेब्रुवारी, २०१६ पासून शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन वसई तालुक्याचे विभाजन करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२८-०१-२०१९) :** (१) व (२) तालुका विभाजनाच्या अनुषंगाने निकष निश्चित करण्याबाबत विभागीय आयुक्त, कोकण यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीचा अहवाल शासनास प्राप्त झालेला आहे. प्राप्त अहवालातील शिफारशीच्या अनुषंगाने सर्व विभागीय आयुक्तांकडून मागविण्यात आलेले अभिप्राय प्राप्त झाले असून त्यांचा विचार करून तालुका विभाजनाचे निकष निश्चित करण्याकामी धोरण अंतिम करण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. सदर धोरण निश्चित झाल्यानंतर प्रकरणपरत्वे नवीन तालुका निर्मितीसंदर्भात उचित निर्णय घेण्याचे संकल्पित आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## इंदिरा गांधी भारतीय महिला विकास साखर कारखाना लि.तांबाळे (ता.भुदरगड, जि.कोल्हापूर) या कारखान्याचा लिलाव रद्द झाल्याबाबत

**(४०) ४५९३२ (०५-१२-२०१८). श्री.जयंत पाटील :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) इंदिरा गांधी भारतीय महिला विकास सहकारी साखर कारखाना लि. तांबाळे (ता.भुदरगड, जि.कोल्हापूर) या कारखान्याचा लिलाव रद्द होवून शासन धोरणानुसार कारखान्याचे सहकारातील अस्तित्व कायम राहण्याबाबतचे एक निवेदन सदरहू कारखान्याच्या अध्यक्षा सौ.विजयमाला देसाई तसेच स्थानिक लोकप्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्री, मा.सहकार मंत्री, प्रधान सचिव, सहकार विभाग आदींकडे दिनांक १३ जुलै, २०१८ तसेच दिनांक ६ सप्टेंबर, २०१८ रोजी सादर केले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू साखर कारखान्याने आयडीबीआय बँकेकडून मंजूर केलेल्या ओटीएस २८.८० कोटीच्या कर्जास शासनाचे व्याजासह थकहमी असून शासनाने महिलांचा एकमेव सहकारी साखर कारखान्यास खास बाब म्हणून

९० टक्के शासन भागभांडवल दिलेले असताना आयडीबीआय बँकेने शासनास विश्वासात न घेता, शासनाची लेखी परवानगी न घेता कर्जाची रक्कम थकल्याने कारखान्याचा ताबा घेवून लिलाव करून मे.अथनी शुगर या खाजगी कंपनीस दिला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदरहू मे.अथनी शुगर यांचेकडे साखर परवाना नसतानाही त्याने गळीत हंगाम सन २०१६-१७ व सन २०१७-१८ या हंगामात कारखान्यात ऊस गाळप केला, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणाची चौकशी करण्यात येऊन सदरहू महिला साखर कारखान्याचे अस्तित्व टिकून राहण्याचेदृष्टीने शासनाने कोणता निर्णय घेतला वा घेण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२८-०१-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.

अध्यक्षा इंदिरा गांधी भारतीय महिला विकास. सह. साखर कारखाना लि., तांबाळे, ता.भुदरगड, जि.कोल्हापूर यांनी दिनांक १३ जुलै, २०१८ रोजी मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना कारखान्याची विक्री थांबवून दीर्घ मुदतीने चालविणेस देणेबाबत निवेदन दिले आहे. तसेच दिनांक ६/९/२०१८ रोजी साखर आयुक्त यांना निवेदन देऊन गाळप परवाना इंदिरा गांधी कारखान्याचे नावे अबाधित रहावा अशी विनंती केली आहे.

(२) इंदिरा गांधी भारतीय महिला विकास. सह. साखर कारखाना लि., तांबाळे, ता.भुदरगड, जि.कोल्हापूर यांनी आयडीबीआय बँकेची थकीत रकमेचा भरणा न केल्यामुळे आयडीबीआय बँकेने दिनांक २१/०६/२०१६ रोजी सरफेसी कायदा २००२ अंतर्गत कारखान्याचा ताबा घेवून दिनांक २३/०६/२०१६ रोजीच्या दैनिक पुढारी या दैनिकात दिनांक २५/०७/२०१६ रोजी कारखान्याच्या मालमत्तेच्या विक्रीची निविदा प्रसिध्द करुन उच्चतम निविदाधारक कंपनी मे.अथणी शुगर्स प्रा. लि. यांना विक्री केला आहे.

(३) मे.अथणी शुगर्स यांनी सदर कारखाना खरेदी केल्यानंतर साखर आयुक्त कार्यालयास गाळप परवाना मिळणेबाबत प्रस्ताव सादर केला होता. तथापि, कारखान्याकडे आय.ई.एम. प्राप्त न झाल्याने सन २०१६-१७ च्या हंगामात गाळप परवाना देण्यात आला नव्हता, दिनांक ७/०६/२०१८ रोजी मे.अथणी

शुगर्स यांना आय.ई.एम. प्राप्त झाल्याने साखर आयुक्तालयाने सन २०१७-१८ साठी दिनांक ०१/१०/२०१८ रोजी गाळप परवाना दिला आहे.
(४) इंदिरा गांधी महिला विकास सह. साखर कारखाना यांनी DRT पुणे येथे आयडीबीआय बँकेने केलेल्या विक्री प्रक्रियेबाबत दावा क्र. SA No/१३४/२०१६ दाखल केला आहे. सदर दाव्याची दिनांक १४/१२/२०१८ रोजी सुनावणी झाली असून सदरची बाब ही न्यायप्रविष्ट आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## सेकंडरी स्कूल्स एम्प्लॉईज को-ऑप सोसायटी, मुंबई पत संस्थेच्या पदाधिकाऱ्यांनी बेकायदेशीर कर्ज वाटप केल्याबाबत

**(४१) ४६०१३ (०५-१२-२०१८). श्री.कपिल पाटील :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) सेकंडरी स्कूल्स एम्प्लॉईज को-ऑप क्रेडिट सोसायटी, मुंबई या पगारदार पतसंस्थेच्या पदाधिकाऱ्यांनी दादर शाखेतून बेकायदेशीर कर्ज वाटप केल्याची आणि भरती केल्याची तक्रार संस्थेचे संचालक जालिंदर सरोदे, सुभाष मोरे आणि संजय पाटील यांनी जिल्हा उपनिबंधक यांच्याकडे माहे ऑक्टोबर, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान केली होती, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, संचालक मंडळाच्या परवानगी शिवाय बेकायदेशीर कर्ज वाटप झाल्याचे सिध्द झाले आहे. तसेच संस्थेचे सेक्रेटरी श्री.किशोर पाटील यांनी कर्ज प्रकरण दडपण्यासाठी इतिवृत्तात फेरफार केल्याचे सिध्द झाले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार शासनाने काय कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२५-०१-२०१९) :** (१) होय.
(२) व (३) संस्थेच्या संचालकांनी केलेल्या तक्रारीच्या अनुषंगाने, उपनिबंधक सहकारी संस्था, एल विभाग, मुंबई यांनी चौकशी केली आहे. त्यानुसार तक्रार

अर्जातील विषय संस्थेच्या व्यवस्थापक समितीच्या सभेबाबत व इतिवृत्ताबाबत वादस्वरुपाचा असल्याने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम-९१ अन्वये योग्य त्या न्यायालयात दाद मागणेबाबत तक्रारदारांना दिनांक ११/०३/२०१६ च्या पत्रान्वये कळविण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ठाणे अपर आयुक्तांच्या अखत्यारीतील पेण प्रकल्पांतर्गत नामांकित शाळेत आदिवासी विद्‌यार्थ्यांना प्रवेश मिळण्याबाबत

**(४२) ४६०२४ (०५-१२-२०१८). अॅड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) आदिवासी विकास विभागाकडून आदिवासी विद्‌यार्थ्यांसाठी नामांकित शाळा योजनेत प्रवेश योजना राबविण्यात येते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, यंदा ठाणे अपर आयुक्तांच्या अखत्यारीतील पेण प्रकल्पामध्ये नामांकित शाळांची संख्या न ठरल्याने विद्‌यार्थ्यांना प्रवेशापासून वंचित राहावे लागले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, राज्यात किती आदिवासी विद्‌यार्थ्यांना नामांकित शाळांमध्ये प्रवेश मिळाला आहे तसेच गेल्या काही वर्षांत या योजनेच्या माध्यमातून किती विद्‌यार्थ्यांचे शिक्षण पूर्ण झाले आहे,
(४) असल्यास, प्रस्तूत प्रकरणी शासनाने चाैकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (३१-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) हे खरे नाही.

सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षासाठी पेण प्रकल्पा अंतर्गत तीन नामांकित शाळांची निवड करण्यात आली असून सदर शाळेमध्ये १७५ विद्‌यार्थ्यांना प्रवेश देण्यात आला आहे.

(३) सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षामध्ये राज्यात एकूण ४१६७ अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना नामांकित शाळेमध्ये प्रवेश देण्यात आलेला आहे.

राज्यामध्ये या योजनेच्या माध्यमातून इयत्ता १ ली ते ८ वी या वर्गापर्यंत एकूण ५४८३४ इतके विद्यार्थी शिक्षण घेत आहेत.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

(५) प्रश्न उदभवत नाही.

---

## राज्यातील साखर कारखान्यांना मदत मिळणेबाबत

**(४३) ४६२७२ (०५-१२-२०१८). श्री.सुजितसिंह ठाकूर : तारांकित प्रश्न क्रमांक ४२६७३ ला दिनांक १७ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) उत्तर प्रदेश सरकारने साखर उद्योगास ५,७०० कोटीचे पॅकेज जाहीर केले आहे त्याच धर्तीवर राज्यातील साखर कारखान्यांना मदत द्यावी अशी मागणी साखर कारखान्यांच्या प्रतिनिधींनी मा.मुख्यमंत्री महोदयाकडे नुकतीच माहे सप्टेंबर,२०१८ मध्ये वा त्यादरम्यान केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त मागणीसंदर्भात मा.मुख्यमंत्री महोदयांनी उत्तर प्रदेश सरकारच्या पॅकेजचा अभ्यास करुन सकारात्मक निर्णय घेण्याबाबतचे आश्वासन साखर कारखान्यांच्या प्रतिनिधींना दिले असून सदरहू निर्णय कधीपर्यंत घेण्यात येणार आहे वा घेण्यात आला आहे व त्याचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत,

**श्री.सुभाष देशमुख (०५-०२-२०१९) :** (१) होय.

महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ लि., मुंबई यांनी दिनांक २५/०९/२०१८ च्या निवेदनाद्वारे मा.मुख्यमंत्री महोदयांकडे राज्यातील साखर कारखान्यांना मदत करण्याची विनंती केली आहे.

(२) साखर उद्योगांच्या समस्यांबाबत मा.मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ३०/११/२०१८ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आले आहेत.

१. साखर निर्यातीसाठी केंद्र शासनाने आतापर्यंत जाहीर केलेल्या योजनांचा अभ्यास करून किती वाहतूक अनुदान राज्य शासनातर्फे देणे आवश्यक आहे यांचा सविस्तर प्रस्ताव सबळ समर्थनासह साखर आयुक्त, पुणे यांनी शासनास सादर करावा.

२. साखर निर्यातीमधून मिळणाऱ्या उत्पन्नातून सर्वच बँकांचे कर्ज वसुल होणार असल्याने सर्वच बँकांनी निर्यातीसाठी नो लीन खाते (No lien Account) उघडून साखर निर्यातीसाठी उपलब्ध करून द्यावी.

उपरोक्त निर्णयानुसार कार्यवाही सुरू आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील शालेय शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्यांना मान्यता देताना अनियमितता झाल्याबाबत

**(४४) ४६३०९ (०५-१२-२०१८). डॉ.सुधीर तांबे :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यामध्ये सुमारे ४ हजार ११ शालेय शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्यांना मान्यता देताना अनियमितता झाली असून या गैरव्यवहारामध्ये शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांवर कार्यवाही केली जाते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन शाळा व्यवस्थापनांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०२-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) संबंधितांवर प्रचलित नियमानुसार कारवाई करण्यात येते.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांच्या पाल्यांना शिक्षणाचा खर्च देण्याबाबत

**(४५) ४६३७९ (३०-११-२०१८). श्री.आनंदराव पाटील : तारांकित प्रश्न क्रमांक ४२००८ ला दिनांक ६ जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात कर्जबाजारीला कंटाळून आत्महत्या केलेल्या शेतकऱ्यांची मुले/मुली शिक्षणापासून वंचित राहत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने आत्महत्याग्रस्त शेतकऱ्यांची मुले/मुली शिक्षणापासून वंचित राहू नये यासाठी त्यांचा शिक्षणाचा खर्च देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (२३-०१-२०१९) :** (१) नाही.

(२) सद्यःस्थितीत शालेय शिक्षण विभागाच्या दिनांक १३ जून, १९९६ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील मान्यता प्राप्त अशासकीय अनुदानित व विनाअनुदानित शिक्षण संस्थामधील मुलांना इयत्ता १ ली ते १० पर्यंतचे शिक्षण प्रमाणित दराने मोफत देण्यात येते, दिनांक ६ फेब्रुवारी, १९८७ च्या शासन निर्णयान्वये इयत्ता १ ली ते इयत्ता १२ वी पर्यंतचे शिक्षण मुलींना प्रमाणित दराने मोफत दिले जाते.

पश्चिम विदर्भातील सहा जिल्ह्यातील शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी अत्यंत अडचणीत असणाऱ्या ४,३४,२९१ कुटुंबांतील इ. १ ली ते १२ वी पर्यंत शिक्षण घेणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांना शासकीय दरानुसार पावतीच्या आधारे संपूर्ण प्रवेश शुल्क व शैक्षणिक शुल्काचा परतावा तसेच प्रत्येक विद्यार्थ्यास वहया, पुस्तके व इतर खर्चापोटी किमान रुपये ५००/- वार्षिक अनुदान दिले जाते. तसेच उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या राजर्षी शाहू

महाराज शिष्यवृत्ती योजनेंतर्गत आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांना शैक्षणिक शुल्क माफ केले जाते. उपरोक्त सवलतींचा लाभ शेतकऱ्यांच्या पाल्यांनाही घेता येईल.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील पट पडताळणीमध्ये पन्नास टक्केपेक्षा जास्त शाळांची मान्यता काढून घेतल्याबाबत

**(४६) ४६६१९ (२८-०१-२०१४). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **शालेय शिक्षण** मंत्री पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) दिनांक ३ ते ५ ऑक्टोबर, २०११ च्या दरम्यान बाहययंत्रणेकडून व्यापक पट पडताळणी दरम्यान पन्नास टक्केपेक्षा जास्त गैरहजेरी आढळून आलेल्या २६५४ प्राथमिक व माध्यमिक अनुदानित शाळांच्या मान्यता काढून घेतल्या होत्या, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या शासन निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालयामध्ये किती रिट पिटीशन दाखल झाले होते,
(३) मा.उच्च न्यायालयाच आदेशाची काटेकोरपणे अंमलबजावणी न करणाऱ्या प्रशासनातील संबंधितांवर कोणती कारवाई प्रस्तावित केली आहे ?

**श्री.विनोद तावडे (२३-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२) मा.उच्च न्यायालयात विविध रिट याचिका व जनहित याचिका दाखल झालेल्या आहेत.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## घोडबंदर (ठाणे) ते मुंबई दरम्यान भुयारी मार्ग बांधण्याबाबत

**(४७) ४८१२८ (२७-०१-२०१४). ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम)** मंत्री पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) घोडबंदर (ठाणे) ते मुंबई दरम्यान भुयारी मार्ग बांधण्याचे मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने घोषित करुन माहे ऑगस्ट, २०१३ मध्ये वा म्यादरम्यान प्रकल्पाचे सादरीकरण केल्याचे दिनांक २ ऑगस्ट, २०१३ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर भुयारी मार्ग प्रकल्पाचे थोडक्यात स्वरुप काय आहे,
(३) असल्यास, त्यावर किती खर्च अपेक्षित आहे व या प्रकल्पाचे काम प्रत्यक्षात केव्हा सुरु करण्यात येणार आहे,
(४) तसेच त्याबाबची सद्य:स्थिती काय आहे ?

**श्री.एकनाथ शिंदे (०२-०२-२०१९) :** (१) घोडबंदर (ठाणे) ते मुंबई दरम्यान भुयारी मार्ग बांधण्याचे काम मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडून प्रस्तावित नाही.

तथापि, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळामार्फत टिकुजीनीवाडी ठाणे ते बोरीवल अशा भुयारी मार्गाचे बांधकाम हाती घेण्याच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाच्या पायाभुत सुविधा समितीच्या दिनांक ३०/११/२०१५ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रकल्पासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास कार्यान्वयीन यंत्रणा म्हणून घोषित करण्यात आले असून सदर प्रकल्पाचा सविस्तर सुसाध्यता अहवाल व सविस्तर प्रकल्प अहवाल पायाभूत सुविधा समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्याचे महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाला निर्देश दिले आहे. सदर प्रकल्पाचा सविस्तर सुसाध्यता अहवाल व सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणेसाठी तज्ञ सल्लागाराची दिनांक ११/०४/२०१६ रोजी नेमणूक करण्यात आली आहे.
(२) सदर भुयारी मार्गाचे स्वरुप खालीलप्रमाणे आहे :-

- बोगद्याची लांबी १०.२० कि.मी. व जोडरस्ता १ कि.मी.
- सध्याच्या ठाणे घोडबंदर या २३ कि.मी. मार्गावरील ५० टक्के वाहतूक प्रस्तावित मार्गावर होण्याची शक्यता

(३) व (४) सदर प्रकल्पाची अंदाजित बांधकाम किंमत रुपये ३००० कोटी आहे.

महाराष्ट्र राज्य वन्यजीव मंडळाच्या दिनांक ३१/०१/२०१८ रोजी झालेल्या १३ व्या बैठकीत सदर प्रकल्पाच्या सर्वेक्षणाची परवानगी

दिनांक १४/०५/२०१८ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झाली असून सविस्तर अहवाल तयार करण्याचे काम प्रगतीपथावर आहे. सदर प्रकल्पच्या बांधकामासाठी पायाभूत सुविधा समितीची मान्यता प्रकल्प झाल्यावर व इतर पर्यावरण परवानग्या व वन विभागाकडून प्रकल्पासाठी परवानगी व प्रकल्पासाठी आवश्यक निधी प्राप्त झाल्यानंतर प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात करण्यात येईल.

---

## मुंबई-गोवा राष्ट्रीय महामार्गावर (ता.माणगांव, जि.रायगड) येथील मोकाट गुरांचा उपद्रव वाढल्याबाबत

**(४८) ४८६०४ (०६-०२-२०१४). श्री.अशोक उर्फ भाई जगताप :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून)** मंत्री पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई-गोवा राष्ट्रीय महामार्गावर (ता.माणगांव, जि.रायगड) येथील मोकाट गुरांचा उपद्रव वाढल्याने अपघातांचा धोका वाढला असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१३ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी ग्रामपंचायत व संबंधित अधिकारी दुर्लक्ष करीत असल्याने शासनाने याबाबत त्वरीत चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१४-०२-२०१९) :** (१) नाही.

(२) मोकाट गुरांचा वावर व उपद्रव टाळणे हे नगरपालिका किंवा स्थानिक ग्रामपंचायत यांच्या नियंत्रणाखालील काम आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

# राज्यातील महानगरपालिकेच्या रुग्णालयात व्हेंटीलेटरच व कर्मचाऱ्यांची संख्या कमी असल्याने रुग्णांना पुरेशा प्रमाणात आरोग्य सेवा मिळत नसल्याबाबत

**(४९) ४९५९६ (०३-०७-२०१४). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.अनिल भोसले, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील महानगरपालिका रुग्णालयात व्हेंटीलेटरची सोय पुरेशा प्रमाणात नसल्याने आणि कर्मचाऱ्यांची संख्या कमी असल्याने रुग्णांना पुरेशा प्रमाणात आरोग्य सेवा मिळत नसल्याचे माहे फेब्रुवारी, २०१४ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्यातील महानगरपालिका रुग्णालयात पुरेशा प्रमाणात व्हेंटीलेटरची सोय उपलब्ध करणेबाबत तसेच कर्मचाऱ्यांची पदे भरणेबाबत कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१२-०२-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही.

राज्यातील काही महानगरपालिकांच्या दवाखान्यात व्हेंटीलेटरची सुविधा उपलब्ध आहे. काही महानगरपालिकांच्या दवाखान्यात ही सुविधा उपलब्ध नसली तरी महानगरपालिकांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय रुग्णालयात व्हेंटीलेटरची सुविधा उपलब्ध आहे.

महानगरपालिकांमध्ये आरोग्य विभागांतर्गत उपलब्ध अधिकारी / कर्मचारी यांच्या मदतीने रुग्णसेवा देण्यात येते.

काही महानगरपालिकांमध्ये कर्मचाऱ्यांची पदे मानधन व करार तत्वावर भरण्यात येतात.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील अपंग वित्तीय महामंडळाकडील कर्ज मंजूरी तात्काळ देण्याबाबत

**(५०) ४९७४४ (२३-०६-२०१४). डॉ.सुधीर तांबे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सामाजिक न्याय मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अपंग वित्तीय महामंडळाकडे अनेक कर्ज मागणी अर्ज बरेच वर्षापासून प्रलंबित आहेत हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कर्ज मंजूरीसाठी विलंब होण्यामागील सर्वसाधारण कारणे काय आहेत,

(३) असल्यास, यावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.राजकुमार बडोले (१५-०२-२०१९) :** (१), (२) व (३) मा.मंत्रिमंडळाच्या दिनांक ०१/०१/२०१९ रोजी झालेल्या बैठकीमध्ये महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळाला NHFDC कडून कर्ज घेण्यासाठी रुपये ७० कोटी इतकी शासन हमी व हमी शुल्काचा दर प्रतिशत प्रतिवर्ष रुपये २ ऐवजी प्रतिशत प्रतिवर्ष रुपये ०.५० इतका करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार पुढील कार्यवाही सुरु आहे.

---

| | |
|---|---|
| **विधान भवन :** | **जितेंद्र भोळे** |
| **मुंबई.** | **सचिव (कार्यभार),** |
| | **महाराष्ट्र विधानपरिषद.** |

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.